कोषागारातून रोख देय अनुदान

सन २००९-१० या आर्थिक वर्षासाठी जिल्हा परिषद पंचायत समित्यांच्या प्रशासकीय व निवासी इमारतीच्या बांधकामास सहाय्यक अनुदान

( लेखाशिर्ष - २५१५ ००५३ व २५१५ १२५६ - योजनांतर्गत)

महाराष्ट्र शासन

ग्राम विकास व जलसंधारण विभाग,

शासन निर्णय क्रमांक: योजना २००९/ प्र.क्र.७८ /पंरा -७

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- २६ फेब्रुवारी, २०१०.

वाचा :-
१. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अंदाज १०.०९/सीआर/२००९/अर्थसंकल्प-३, दिनांक २३.३.२००९.
२. शासन पत्र , ग्रामविकास व ज. सं. विभाग, क्र.बीजीटी १००९/प्र.क्र.३०/वित्त-१, दिनांक १२.६.२००९
३. शासन निर्णय, ग्रामविकास व ज. सं. विभाग. क्र.योजना १००९/प्र.क्र.७८/पंरा-७, दिनांक ७.१२.२००९
४. शासन निर्णय, ग्रामविकास व ज. सं. विभाग, क्र.योजना १००९/प्र.क्र.७८/पंरा-७, दिनांक २९.१.२०१०

शासन निर्णय :-

सन २००९-२०१० या वित्तीय वर्षाच्या पहिल्या चार महिन्यांच्या कालावधीत अंमलबजावणी खालील योजना पुढे चालू ठेवण्यासाठी महाराष्ट्र विधान मंडळाने "महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) विधेयक २००९" मंजूर केले असून, ते महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ९ म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, दिनांक २३ मार्च २००९ मध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे. त्यानुसार जिल्हा परिषदा व पंचायत समित्यांच्या प्रशासकीय व निवासी इमारतींच्या बांधकामासाठी चार महिन्याच्या कालावधीसाठी उपलब्ध झालेल्या रुपये १५६६.५० लक्ष अर्थसंकल्पिय तरतूदीतून माहे जून,०९ च्या कॅश-फ्लो प्रमाणे एकूण रु.१०००.०० लक्ष व माहे जुलै,०९ च्या कॅश-फ्लो प्रमाणे एकूण रु.५६६.५० लक्ष इतके सहाय्यक अनुदान संदर्भीय अनुक्रमे दिनांक ३०जून,२००९ व ३१ जुलै, २००९ च्या शासन निर्णयान्वये जिल्हा परिषदांना वितरीत करण्यात आले आहे. तसेच माहे डिसेंबर,२००९ व जानेवारी,२०१० च्या च्या कॅश-फ्लो प्रमाणे प्रशासकीय इमारत बांधकामासाठी एकूण रु.२५००.०० लक्ष व रु.१७००.०० लक्ष आणि निवासी इमारत बांधकामासाठी प्रत्येकी रु.२५०.०० लक्ष इतके सहाय्यक अनुदान संदर्भीय दिनांक ७ डिसेंबर,२००९ व दिनांक २९ जानेवारी,२०१० च्या शासन निर्णयान्वये जिल्हा परिषदांना वितरीत करण्यात आले आहे.

२. आता, वित्त विभागाच्या संदर्भीय अ.क्र.१ वरील दिनांक २३मार्च,२००९ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या वितरणाच्या अधिकाराच्या विहित मर्यादेच्या अधीन राहून व जिल्हा परिषदांची मागणी विचारात घेवून, माहे फेब्रुवारी,२०१० च्या कॅश-फ्लो प्रमाणे जिल्हा परिषदा व पंचायत समित्यांच्या प्रशासकीय इमारतींच्या बांधकामासाठी एकूण रक्कम रु.८००.०० लक्ष (अक्षरी रुपये आठशे लक्ष फक्त) इतके सहायक अनुदान माहे फेब्रुवारी,२०१० मध्ये मंजूर करुन, संबंधित जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या अधिनस्त ठेवण्यास मंजूरी देण्यात येत आहे :-

| लेखाशिर्ष - २५१५ ००५३ खाली वितरीत करण्यात आलेला निधी | | |
|---|---|---|
| अ.क्र | जिल्हा परिषद / पंचायत समितीचे नाव | माहे फेब्रुवारी, २०१० साठी वितरीत निधी (रु.लक्ष मध्ये) |
| 1 | 2 | 3 |
| मराठवाडा | | |
| १ | पं.स. भोकर, जि. नांदेड | ४८.४५ |
| २ | पं.स. किनवट, जि. नांदेड | ४९.१० |
| ३ | पं.स. हदगाव, जि. नांदेड | ४१.९२ |
| ४ | पं.स. हिमायतनगर, जि. नांदेड | ४३.२८ |

| | | |
|---|---|---|
| ५ | पं.स. नांदेड, जि. नांदेड | ४३.८८ |
| | एकूण | २२६.६३ |
| विदर्भ | | |
| १ | पं.स. कामठी, जि.नागपूर | ४७.२४ |
| २ | पं.स. मौदा, जि.नागपूर | ४७.४६ |
| | एकूण | ९४.७० |
| उर्वरीत महाराष्ट्र | | |
| १ | पं.स.जामखेड, जि.अहमदनगर | ४६.७९ |
| २ | पं.स.पारनेर, जि.अहमदनगर | ४६.६१ |
| ३ | पं.स.अकोले, जि.अहमदनगर | ३९.९१ |
| ४ | पं.स.सिन्नर, जि.नाशिक | १००.०० |
| ५ | पं.स.आजरा, जि.कोल्हापूर | ५०.४५ |
| ६ | पं.स.शाहुवाडी, जि.कोल्हापूर | ४७.७० |
| ७ | पं.स.गडहिंग्लज, जि.कोल्हापूर | ४९.८६ |
| ८ | पं.स.फलटण, जि.सातारा | ५०.३५ |
| ९ | पं.स.महाड, जि.रायगड | ४७.०० |
| | एकूण | ४७८.६७ |
| एकूण मराठवाडा+विदर्भ+उर्वरीत महाराष्ट्र | | ८००.०० |
| | | (अक्षरी रुपये आठ कोटी फक्त) |

३. वरील विवरणातील कामांकरीता होणारा खर्च मागणी क्र. एल-३ "२५१५ इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १०१-पंचायत राज, ३१-सहायक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारत बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३) (योजनांतर्गत)" या लेखाशिर्षाखाली सन २००९-२०१० साठी करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. माहे फेब्रुवारी,२०१० या महिन्यांसाठी उपलब्ध करुन दिलेला निधी त्याच कारणांसाठी तात्काळ खर्च करुन, सदर सहाय्यक अनुदानाच्या विनियोजनासंबंधीचे उपयोगिता प्रमाणपत्रे, महालेखापाल, संबंधीत विभागीय आयुक्त व या विभागाकडे तात्काळ पाठविण्याची जबाबदारी संबधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील.

५. प्रस्तुतचा शासन निर्णय शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अंदाज १०.०९/सीआर/२००९/अर्थसंकल्प-३, दिनांक २३ मार्च २००९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईट वर उपलब्ध असून, त्याचा सांकेतांक क्र. २०१००२२७१३४३३०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

( चंद्रकांत ह.वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत-

१. विभागीय आयुक्त, कोकण, पुणे, नाशिक, औरंगाबाद, नागपूर,
२. महालेखापाल लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा, महाराष्ट्र - १ मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद- नांदेड, नागपूर, अहमदनगर, नाशिक, कोल्हापूर, सातारा, रायगड,
४. कार्यकारी अभियंता (बांधकाम),जि.प., नांदेड, नागपूर, अहमदनगर, नाशिक, कोल्हापूर, सातारा, रायगड,
५. गटविकास अधिकारी, पं.स., भोकर, किनवट, हदगाव, हिमायतनगर, नांदेड (जि.नांदेड), पं.स.मौदा, कामठी (जि.नागपूर), पं.स. जामखेड, पारनेर, अकोले (जि.अहमदनगर), पं.स.सिन्नर (जि.नाशिक), पं.स.आजरा, शाहुवाडी, गडहिंग्लज, (जि.कोल्हापूर ), पं.स.फलटण, (जि.सातारा), पं.स.महाड (जि.रायगड)

६. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जि.प. नांदेड, नागपूर, अहमदनगर, नाशिक, कोल्हापूर, सातारा, रायगड,
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड, नागपूर, अहमदनगर, नाशिक, कोल्हापूर, सातारा, रायगड,
८. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
९. उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नांदेड, नागपूर, अहमदनगर, नाशिक, कोल्हापूर, सातारा, रायगड,
१०. वित्त विभाग, (व्यय १५/ अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
११. नियोजन विभाग (का.क्र.१४४३) मंत्रालय, मुंबइ ४०० ०३२.
१२. कार्यासन, वित्त-१, वित्त-७ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
१३. निवड नस्ती कार्यासन क्रमांक पं.रा.७, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.